# जन वाचन आंदोलन





जनवाचन आंदोलन हे पुस्तकांना गावागावात घेऊन जाणारे आंदोलन आहे. नवसाक्षर व अर्धशिक्षित लोकांमध्ये पुस्तकांचे सामुदायिक वाचन करणे, ते ऐकणे आणि ऐकवणे हा याचा उद्देश आहे. आज गावातल्या लोकांपर्यंत पुस्तके पोचत नाहीत. त्यांची भाषा त्यांना उमगत नाही आणि किंमती परवडत नाहीत. अशा नव-वाचकांपर्यंत पुस्तके पोचवण्याचे काम भारत ज्ञान विज्ञान समितीने अंगिकारले आहे. ही पुस्तके प्रसिद्ध लेखकांची आणि सोपी, सुटसुटीत व स्वस्त किंमतीत असावीत असा प्रयत्न आहे.

या आंदोलनातून काय साध्य होईल?

गावागावात जनवाचनाची व जनवाचनालयांची संस्कृती निर्माण होईल. साक्षरता आंदोलनातून हस्तगत केलेली अक्षरकौशल्ये लोक स्वत: विकसित करू शकतील. त्यांच्या ज्ञानविज्ञानाच्या कक्षा विस्तारतील. त्यांच्या सामाजिक, राजकीय आणि सांस्कृतिक जाणिवांची पातळी उंचावू शकेल. आपल्या मूलभूत हक्कांच्या आणि एकंदर परिवर्तनाच्या लढ्यासाठी जागृत होऊन ते उभे ठाकू शकतील.

देशातील लोकशाही टिकण्यासाठी आणि अर्थपूर्ण होण्यासाठी हे आवश्यक आहे. साक्षरता म्हणजे केवळ अक्षर ओळख नव्हे तर संपूर्ण जग जाणण्याचे ते कार्य आहे. या दिशेने, गावागावातील लोकांच्या खांद्याला खांदा भिडवून, आम्ही पुढे जाऊ इच्छितो.




भारत ज्ञान विज्ञान समिती

किंमत रु. २-५०

# शिवराजची गलोल

लेखक : भीष्म सहानी
रुपांतर : विनया देशपांडे





भारत ज्ञान विज्ञान समिती

पुस्तकाचे नाव : शिवराजची गलोल

लेखक : भीष्म सहानी
अनुवाद : विनया देशपांडे

चित्रकार : अस्लम मुल्ला/बालाजी मुरशेटवाड

जवाआं/१८

प्रकाशन : फेब्रुवारी १९९७

नववाचकांसाठी भारत ज्ञान विज्ञान समिती तर्फे राष्ट्रीय साक्षरता मिशनच्या सहकार्याने देशभर चालवल्या जात असलेल्या 'जनवाचन आंदोलन' मोहिमेसाठी प्रकाशित

मूल्य : २ रुपये ५० पैसे



प्रकाशक : दत्ता देसाई
राज्य समन्वयक, भारत ज्ञान विज्ञान समिती (महाराष्ट्र)
अक्षय, २१६, केळकर रस्ता, नारायण पेठ, पुणे ४११०३०
फोन : ४५६६९४
मुद्रण स्थळ : महाराष्ट्र सहकारी मुद्रणालय, पुणे ४११००४

अक्षर जुळणी व मांडणी : दिनानाथ मनोहर

# शिवराजची गलोल

मी सहावीत शिकत होतो तेव्हाची गोष्ट. तऱ्हेतऱ्हेची मुलं माझ्याबरोबर शिकत होती. बबन नावाचा एक मुलगा होता. त्याची सगळी कामं अर्धवट असायची. त्याला एखादा प्रश्न कळला नाही की तो शाईची दौत उचलून पीत असे. काळी शाई प्यायल्यावर मेंदू तल्लख होतो असं त्याला कोणीतरी सांगितलं होतं. सर चिडून त्याच्यावर हात उगारत तेव्हा कर्कश्श आवाज काढून तो ओरडू लागे, ''अगं आई गं... मेलो...मेलो, सरानी मला खलास केलं रे.'' इतक्या जोरात तो ओरडे की, जवळपासच्या वाड्या, वस्त्यांमधली पहिलवान मंडळीदेखील काय झालं हे पहाण्यासाठी बाहेर येत! सर गडबडीने हात खाली घेत. चुकून ते मारायला लागलेच तर बबन त्यांनाच बिलगून जाई आणि जोरजोरात विनवी, ''यावेळी माफ करा ना सर... आपण राजासारखे दिलदार आहात, आपण महान अकबर आहात..आपण मायाळू बादशहा आहात, आपण मायबाप सरकार आहात, आपणच माझे आजोबा..माझे पणजोबा आहात..''

वर्गातील सर्व मुलं हसायाला लागत आणि मास्तर भांबावून त्याला मारणं थांबवत असत. असा होता बबन.

दुसऱ्या दिवशी शाळेत येताना तो एखादा बेडूक पकडून आणत असे. हातावर बेडकाची चरबी लावली तर वेताच्या छडीचा काही परिणाम होत नाही असं तो सर्वांना सांगे.

दुसरा एक मुलगा होता. त्याचं नाव शिवराज. त्याला आम्ही सर्वजण घाबरत असू. तो चिमटा काढी तेव्हा सापाने दंश केल्यासारखं वाटायचं. फार द्वाड मुलगा होता. गल्लीतल्या नाल्यात जेव्हा एखादा खेकडा येऊन बसे तेव्हा शिवराज सरळ हाताने त्याला पकडून त्याची नांगी काढून टाके. अन् मग त्या खेकड्याच्या पायाला दोरा बांधून पतंगाप्रमाणे त्याला उडवण्याचा प्रयोग चाले. बागेत गेला तर फुलांवर बसलेल्या फुलपाखरांना सहज मुठीत पकडे. त्यांना बोटांनी चिरडून टाके, किंवा चिरडायचं मनात नसलं तर तडफडणाऱ्या फुलपाखराला टाचणीनं वहीत जेरबंद करत असे.

शिवराजला जर विंचू चावला तर तो विंचूच मरून जाईल असं त्याच्याबद्दल बोललं जायचं. त्याचं रक्त इतकं कडू आहे की त्याला काही होत नाही असं सगळे म्हणायचे. हातात सतत गलोल घेऊनच तो फिरायचा. त्याचा नेम फार अचूक होता. पक्ष्यांच्या घरट्यावर त्याची विशेष दृष्टी असे. झाडाखाली उभं राहून तो असा काही नेम पकडे की दुसऱ्याच क्षणी 'चीं..चीं..' आवाज येई व घरट्यातून पिसं हवेत उडालेली दिसत. तो लगेच झाडावर चढून घरट्यातील अंडी बाहेर काढी. ते घरटे छिन्नविछिन्न केल्यावरच तो स्वस्थ बसे.

त्याला नेहमी दुसऱ्याला त्रास देणारे खेळच आवडत. शिवराजची आईदेखील त्याला राक्षस म्हणूनच हाक मारीत असे. तो खिशात नेहमी तऱ्हतऱ्हेच्या वस्तू घेऊनच फिरे. कधी मैनेचं पिल्लू, कधी वेगवेगळी अंडी, तर कधी टोकदार दातांचे उंदीर.





सगळी मुलं त्याला घाबरत. कोणाबरोबर भांडण झालं तर तो सरळ त्याच्या छाताडावर मुंसडी मारून धडक देई. किंवा त्याच्या हाताला कडकडून चावा घेई. शाळा सुटल्यावर आम्ही सगळे आपापल्या घरी जात असू. परंतु शिवराज मात्र कुठे फिरत असे कोण जाणे!

कधी कधी तो आम्हाला चमत्कारिक गोष्टी सांगे. एक दिवस तो सांगू लागला, ''आमच्या घरी एक 'गो' रहाते. माहीत आहे 'गो' म्हणजे काय ते?''

''नाही ना, काय असतं 'गो' म्हणजे?''

''गो एक सापासारखं जनावर असतं. हातभर लांब, पण त्याला पाय असतात. सापाला पाय नसतात.'' ते ऐकून आमच्या अंगावर सरसरून काटा आला.

''आमच्या घरात पायऱ्यांच्या खाली गो रहाते.'' मग म्हणाला, ''एकदा एखादी वस्तू आपल्या पंजात पकडली तर ती वस्तू ती कधी सोडत नाही. काही झालं तरी सोडत नाही.''

आमचं अंग पुन्हा शहारून उठलं.

''चोर स्वत:जवळ 'गो' पाळतात. ते भिंत ओलांडण्यासाठी तिचा उपयोग करतात. ते 'गो' च्या एका पायात दोर बांधतात. मग ज्या भिंतीला ओलांडायचं तिच्यावरच्या बाजूला दोराला झुलवून 'गो' ला फेकतात. भिंतीजवळ आल्यावर 'गो' आपल्या पंजांनी भिंतीला पकडते. तिचा पंजा इतका मजबूत असतो की माणूस दोराला लटकला तरी 'गो' भिंतीला सोडत नाही.चोर मग त्या दोरीच्या मदतीनेच भिंतीवरून चढून जातात.



'' मग भिंतीला तुमची गो सोडून कशी देते?'' मी विचारलं.

'' वर गेल्यावर चोर तिला थोडं दूध पाजतात. दूध प्यायल्यावर तिचे पंजे ढीले पडतात. ''

असेल किस्से शिवराज आम्हाला नेहमी ऐकवायचा. त्याच काळात माझ्या वडलांना बढती मिळाली. आम्ही एका मोठ्या घरात राहायला गेलो. घर कसलं, बंगलाच होता तो. परंतु एखाद्या पुरातन वाड्याप्रमाणे आणि शहराच्या बाहेर. विटांच्या फरशा, उंचच उंच भिंती आणि छप्पर. मोठमोठ्या खोल्या. भिंतीत मोठमोठे कोनाडे आणि रूंद जिने. बाहेर पटांगण आणि काही झाडं झुडपं होती. घर तर छान होतं पण खूप रिकामं रिकामं वाटायचं. शहरापासून लांब असल्यामुळे इथं माझे मित्र



देखील कोणीच नव्हते.

तेव्हा तिथं शिवराज येऊ लागला. कदाचित त्याला माहीत होतं की इथं चांगली शिकार मिळेल. या जुन्या घरात आणि त्याच्या अंगणात पक्ष्यांची बरीच घरटी होती. आसपास माकडं हिंडायची आणि घराबाहेर झाडांमध्ये घुशींची दोन बिळं होती. घराच्या पिछाडीला एक मोठी गोदामवजा खोली होती. त्या खोलीला आईने अडगळीची खोली बनवली होती. नको असलेल्या गोष्टी त्यात ठेवल्या होत्या. इथे कबुतरांनी आपला डेरा जमवला होता. दिवसभर तेथे गुटर्रगूं चालू असे. त्याच्या जवळच एका तुटक्या फुटक्या झरोक्याजवळ एक मैनेचं घरटं होतं. खोलीतील फरशीवर सगळीकडं पिसं, अंड्यांची टरफलं, आणि घरट्यांच्या काड्या पसरलेल्या असायच्या.

शिवराज आला की त्याच्याबरोबर भटकायला मी बाहेर पडायचो. एकदा त्याने साळिंदर उचलून आणलं. त्याचं ते काळतोंड आणि काटेरी अंग बघूनच मी घाबरलो होतो. माझं शिवराज बरोबर असं भटकणं आईला अजिबात आवडत नसे. परंतु मी एकटाच घरी राहून तरी काय करणार? आई त्याला राक्षसच म्हणायची. गरीब मुक्या जनावरांचा असा छळ करू नये यासाठी त्याला खूप समजावयाची. एक दिवस आई मला म्हणाली, ''तुझ्या मित्राला घरटी पाडण्यातच रस असेल तर त्याला म्हणावं अडगळीच्या खोलीतील घरटी तरी साफ कर. चिमण्यांनी खोली सगळी घाण केली आहे.''



''पण आई, तूच तर म्हणत होतीस की, घरटी पाडली तर पाप लागतं म्हणून,'' मी विचारलं.

''मी काही पक्ष्यांना मारायला सांगत नाही. तो तर पक्ष्यांवर गलोल चालवतो. घरटं काढून टाकणं वेगळं आणि पक्ष्यांना मारणं वेगळं,'' आई म्हणाली.

एक दिवस असाच शिवराज घरी आला. मी त्याला मागच्या बाजूला त्या अडगळीच्या खोलीत घेऊन गेलो. त्या खोलीला कुलूप होतं. कुलूप उघडून आत गेलो. संध्याकाळ व्हायला आली होती आणि खोलीत नीरव शांतता होती. खोलीत गेल्यावर एखाद्या जनावरांच्या गोठ्यात आल्यासारखं वाटलं. भयंकर वास आणि जमिनीवर पिसं, काड्या आणि पक्ष्याची शीटं पडलेली होती.

खरं तर मी घाबरलो होतो.मला वाटलं, इथं पण शिवराज शिकार खेळेल. घरट्यांना तोडून मोडून टाकेल, पक्ष्यांचे पंख ओढेल, त्यांची अंडी फोडेल. असं तो करायला लागला की माझ्या छातीत कालवाकालव व्हायची. कोण जाणे आईने त्याला या खोलीतील घरटी काढून टाकायला का सांगितले. मला त्याच्या बरोबर खेळायची देखील मनाई होती आणि आता त्याला घरटी काढायला सांगितलं.

मी शिवराजवर नजर टाकली तर त्याने गलोल हातात धरली होती आणि तो छपराखालच्या मैनेच्या घरट्याकडे टक

लावून पहात होता. अडगळीच्या खोलीचे छत त्रिकोणी आकाराचे होते. दोन्ही बाजूला उतार आणि त्याच्या खाली एक लांब तुळई दोन्ही भिंतीतून आरपार गेली होती. त्या तुळईच्या एका बाजूला झरोक्याजवळ एक मोठं घरटं होतं. या घरट्यातून काड्या, कापूस, पिसांचे लोंबणारे घोस आम्हाला दिसत होते. हे मैनेचं घरटं होतं. कबुतरं तुळईच्या दुसऱ्या टोकाला गुटर्र गूं.. गुटर्र गूं करत होती. आणि त्या तुळईवरून सारखी ये जा करत होती.

''घरट्यात मैनेची पिल्लं आहेत,'' शिवराज म्हणाला आणि त्यानं गलोलने नेम धरला.

तेवढ्यात मला घरट्यातून दोन छोट्या छोट्या पिल्लांच्या चोची बाहेर डोकावताना दिसल्या.

''बघितलंस? '' शिवराज म्हणाला, ''ह्या विलायती मैना आहेत. त्या इथं घर नाही बनवत. नक्कीच ह्यांचे आई बाबा आपल्या थव्यातून वाट चुकलेले दिसतात. इथं येऊन त्यांनी घर बांधलेले दिसतयं.''

''यांचे आईबाबा कुठे आहेत?'' मी विचारलं.

''खायला आणायला गेले असतील. येतीलच आता.'' असे म्हणून शिवराजने परत गलोल उचलली.



मी त्याला गलोल मारण्यापासून थांबवणार होतो, पण तेवढ्यात शिवराजच्या गलोलीतून फर्ररर्र आवाज झाला आणि पाठोपाठ टणत्कार वाजला. गलोलीतील दगड घरट्याला न लागता सरळ वरच्या पत्र्याच्या छताला जाऊन लागला. दोन्ही चोची घरट्यात दिसेनाशा झाल्या. सगळीकडे एकदम शांतता पसरली. बहुधा मैनेची पिल्लं भितीनं निपचीत बसून राहिली असावीत.

तेवढ्यात शिवराजनं गलोलीनं आणखी एक दगड सोडला. यावेळी दगड तुळईला लागला. शिवराजला आपल्या अचूक नेमबाजीबद्दल फार गर्व होता. दोन्ही वेळा नेम चुकल्यामुळे तो वैतागला. मग थोडा वेळ तो शांतपणे उभा राहिला. ज्यावेळी मैनेच्या पिल्लांनी आपल्या चोची बाहेर काढून घरट्यातून बाहेर डोकावलं, त्याचवेळी शिवराजने तिसऱ्यांदा दगड सोडला. यावेळी दगड घरट्याच्या कडेवर आपटला. गवताचे तीन चार तुकडे आणि कापसाचे बोळे उडाले. ते भिरभिरत येऊन फरशीवर पडू लागले. परंतु घरटं पडलं नाही.

शिवराजने पुन्हा गलोल ताणून नेम धरला. त्याचवेळी खोलीत एक भयानक सावली झेपावली. आम्ही मान वर करून वर पाहिलं. झरोक्यातून येणारा प्रकाश पूर्ण बंद झाला होता. खोलीत अंधार पसरला होता. झरोक्याच्या कठड्यावर एक मोठी घार आपले पंख पसरवून बसली होती. आम्ही गोंधळून तिच्याकडे पाहू लागलो. झरोक्यावर बसलेली ती घार भितीदायक वाटत होती.

" हे घारीचं घरटं दिसतयं. घार आपल्या घरट्यात परतलेली दिसते," मी म्हणालो.

" नाही, घारीचं घरटं इथं कसं असेल? घार आपलं घरटं झाडावर बांधते. हे मैनेचं घरटं आहे. " शिवराज म्हणाला.

त्याचवेळी घरट्यातून जोरजोरात चीं..चीं... आवाज यायला लागला. घरट्यात बसलेली पिल्लं पंख फडफडवत ओरडायला लागली.

आम्ही दोघंही स्तब्ध राहून घार काय करते ते पाहू लागलो. आमची नजर घारीकडं एकटक खिळली होती.

घार झरोक्यातून आत आली. आपले पंख जवळ घेऊन झरोक्यातून सरळ भिंतीच्या आरपार गेलेल्या तुळईवर ती उतरली. आपलं छोटसं डोकं कधी डावीकडे तर कधी उजवीकडे वाकवून सभोवताली बघू लागली. मी चूपचाप उभा होतो. शिवराजही गप्प उभा होता. तो काय विचार करत होता कोण जाणे.

घरट्यातून आता आधीपेक्षाही जास्त जोरानं चीं..चीं... आवाज येत होता. मैनेची पिल्लं अतिशय घाबरलेली दिसत होती.

"ही इथं रोज येत असावी," शिवराज म्हणाला.



आता आमच्या लक्षात आलं, फरशीवर ठिकठिकाणी पिसं आणि मांसाचे तुकडे का पडलेले दिसत होते ते. नक्कीच घार रोज या घरट्यावर झडप घालत असणार. हिच्याच चोचीतून मांसाचे तुकडे आणि रक्ताच्या चिळकांड्या उडत असणार. शिवराज अजूनही एकटक घारीकडेच पहात होता.



आता घार हळूहळू तुळईवरून चालत घरट्याच्या दिशेनं सरकू लागली. घरट्यात बसलेली मैनेची पिल्लं पंख फडफडवून जोरात किंचाळायला लागली. घार झरोक्यात येऊन बसल्यापासूनच ती चित्कार करत होती. शिवराज अजूनही स्तब्ध उभा राहून,

स्थिर नजरेनं घारीकडे पहात होता.

माझा थरकाप उडाला. माझ्या मनात राहून राहून एकच विचार येत होता. काय फरक पडतो, मैनेच्या पिल्लांना घारीनं मारलं काय किंवा शिवराजनं त्याच्या गलोलीने टिपलं काय? जरी घार आली नसती तरी शिवराजने इतक्या वेळात मैनेचं ते घरटं खाली पाडलंच असतं.

त्याचवेळी शिवराजनं गलोल उचलली आणि सरळ घारीवर नेम धरला.

''घारीला नको त्रास देवू, ती तुझ्यावर झेपावेल.'' मी म्हणालो.

पण शिवराजनं तिकडे पूर्ण दुर्लक्ष केलं आणि गलोलीतून दगड सोडला. घारीला दगड लागला नाही. दगड छपरावर आपटून खाली पडला. घारीने आपले भले मोठे पंख पसरवले आणि खाली वाकून आमच्यावर नजर रोखली.

''चल, इथं थांबणं बरोबर नाही'' मी घाबरून म्हटलं.

''नाही. आपण गेलो तर घार पिल्लांना खाऊन टाकेल!''

त्याच्या तोंडून हे वाक्य ऐकून मी हडबडलो. खरंतर तो



स्वत:च घरटं तोडण्यासाठी गलोल घेऊन आला होता!

शिवराजनं आणखी एकदा नेम धरला. परंतु घार तुळईवरून उडाली आणि पंख पसरवून गोदामाला अर्धी चक्कर मारून पुन्हा तुळईवर जाऊन बसली. घरट्यातील पिल्लांचा चित्कार चालूच होता.

शिवराजनं पटकन गलोल माझ्या हातात खुपसली. खिशातून पाच सहा दगड काढून माझ्या हातावर ठेवले आणि तो म्हणाला, ''तू घारीवर गलोल चालव. चालवतच राहा. तिला अजिबात बसू देवू नको.'' आणि स्वत: पळत जाऊन भिंतीजवळ ठेवलेलं टेबल ओढत खोलीच्या मध्यभागी आणायला लागला. मला गलोल चालवणं येत नव्हतं. एक दोनदा दगड ठेवून मी गलोल चालवली, पण दरम्यान घार खोलीच्या दुसऱ्या तुळईवर जाऊन बसली.

शिवराजनं टेबल ओढत अगदी मैनेच्या घरट्याखाली आणलं. टेबलावर एक तुटलेली खुर्ची ठेवली मग उडी मारून त्या टेबलावर व तिथून खुर्चीवर तो उभा राहिला. त्यानंतर दोन्ही हात उंच करून त्यानं हळूच तुळईवरचं ते घरटं काढलं. हळू हळू खुर्चीवरून तो टेबलावर उतरला. घरटं हातात घट्ट धरून त्यानं जमिनीवर उडी मारली.

'' चल..चल.. बाहेर पड.'' असं म्हणत तो दरवाजाकडं पळाला.



अडगळीच्या त्या गोदामवजा खोलीतून पळत आम्ही गॅरेजमध्ये आलो. गॅरेजला एकच दरवाजा होता आणि भिंतीत एकच छोटासा झरोका होता. गॅरेजमध्ये पण एक तुळई होती. ''इथं घार येऊ शकत नाही.'' असे म्हणत शिवराजनं इकडं तिकडं पाहिलं. मग तो तुटलेल्या खोक्यावर चढला. हात वर करून त्यानं ते घरटं तुळईवर ठेवलं.

थोड्याच वेळात घरट्यात बसलेली ती पिलं शांत झाली. शिवराजने खोक्यावर चढून मैनेच्या घरट्यात डोकावलं. मला वाटलं आता नेहमीप्रमाणं दोन्ही हात उचलून तो पिल्लांना एकदम





गपकन् धरणार आणि खिशात घालून बाहेर पडणार. पण त्यानं तसं काही केलं नाही. खूप वेळ तो घरट्यात डोकावून पहात राहिला, मग हळूच म्हणाला,

''जा, थोडं पाणी आण. त्यांना तहान लागली आहे. त्यांच्या चोचीत थेंब थेंब पाणी घालू.''



मी बाहेर गेलो. एका वाडग्यात थोडं पाणी आणलं. दोन्ही छोटी छोटी पिल्लं चोची वर करून धापा टाकत होती. शिवराजनं त्यांच्या चोचीत थेंब थेंब पाणी घातलं. पण पिल्लांना त्यानं स्वतः हात लावला नाही आणि मलाही शिवू दिलं नाही.



''या पिल्लांचे आईबाबा इथं कसं पोचणार?'' मी विचारलं.

''ते या झरोक्यातून येतील. ते आपोआप यांना शोधून काढतील'' शिवराजनं उत्तर दिलं.

आम्ही खूप वेळ गॅरेजमध्येच बसून राहिलो. शिवराज खूप वेळ त्या गोदामातील मोठे झरोके बंद करण्याचे बेत रचत राहिला. त्यामुळे घारीला आत येता येणार नाही, असं तो म्हणत होता. संपूर्ण वेळ संध्याकाळभर तो घारीविषयीच बोलत राहिला.

दुसऱ्या दिवशी जेव्हा शिवराज माझ्या घरी आला तेव्हा त्याच्या हातात गलोल नव्हती आणि दगडसुद्धा नव्हते. आता त्याचा खिसा चाऱ्याने भरलेला होता. आम्ही खूप वेळ मैनेच्या पिल्लांना चारा भरवत बसलो होतो. आणि त्यांच्या करामती डोळे भरून पहात होतो.

